महाराष्ट्र लोकसेवा हक्क अंतर्गत लोकसेवा पुरविण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था २०१५ /प्र.क्र. १७९ / पापु-०१**

गो. ते. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: :- ३० सप्टेंबर, २०१५

**वाचा :-** शासनाची महाराष्ट्र जीवन प्राधिकरण तसेच भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना लिहीलेली समक्रमांकाची दिनांक ३१.७.२०१५ ची पत्रे.

**प्रस्तावना :-**

राज्यात पात्र व्यक्तींना पारदर्शक, कार्यक्षम व समयोचित लोकसेवा देण्याकरिता आणि पात्र व्यक्तींना लोकसेवा देणाऱ्या शासकीय विभागांमध्ये व अभिकरणांमध्ये आणि इतर सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये पारदर्शकता व उत्तरदायित्व आणण्यासाठी आणि तत्संबंधित व तदनुषंगिक बाबींकरिता तरतूद करण्यासाठी दिनांक २८.४.२०१५ रोजी अध्यादेश निर्गमित करण्यात आला आहे. सदर अध्यादेशाचे रुपांतर अधिनियमांत झाले असून सदर अधिनियम दिनांक २१.८.२०१५ च्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आला आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या नियंत्रणा खाली असलेल्या प्राधिकरण/ कार्यालयाकडून नागरिकांना ज्या सेवा प्रत्यक्ष दिल्या जात आहेत अशा सेवांची निवड करुन त्या सेवा निश्चित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या नियंत्रणा खाली असलेल्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण तसेच भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या प्राधिकरण/कार्यालयाकडून खालील सेवा महाराष्ट्र लोकसेवा हक्क अंतर्गत पुरविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण :-

१. नळ जोडणी देणे.
२. पाणी बील देयका संबंधी तक्रारीचे निवारण करणे.

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा :-

१. विंधन विहिर सर्वेक्षण.
२. वाळू उत्खनन सर्वेक्षण.
३. भूजल सर्वेक्षण प्रमाणपत्र देणे.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण तसेच भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी त्यांच्या कडून पुरवावयाच्या सेवा राजपत्रात अधिसूचित करण्याबाबतची कार्यवाही तातडीने करावी. तसेच सदर सेवा पुरविण्याबाबत आवश्यक असलेला अर्ज, प्रमाणपत्र, शुल्क निश्चित करुन तो Maha Online वर उपलब्ध करुन देण्याबाबतची कार्यवाही तातडीने करण्यात यावी. या संदर्भात माहिती व तंत्र संचालनालयातील संबंधितांशी संपर्क साधून त्याबाबतची आवश्यकती कार्यवाही तात्काळ पूर्ण करावी.

३. उपरोक्तनुसार सेवा अधिसूचित करण्यात आल्यानंतर या लोकसेवांची सूची, विहीत कालमर्यादा, विहीत अर्ज व नमुने, सेवांसंदर्भातील शुल्क, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व द्वितीय अपिलीय अधिकारी यांचा तपशिल कार्यालयाच्या सूचना फलकावर तसेच त्यांच्या संकेतस्थळावर किंवा पोर्टलवर प्रदर्शित करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२९१७३२२८४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.09.30 16:41:27 +05'30'

**(प्रमोद गि. कानडे)**
**अवर सचिव**

प्रत,

१. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. अपर मुख्य सचिव ( र.व का. ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय ( विस्तार ), मुंबई-३२.
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व उपसचिव व कार्यासने
७. निवडनस्ती ( पापु-०१ )